# रजिया चा आशेचा किरण

## एका अफगाणी मुलीचे शाळेत जाण्याचे  स्वप्न



लेखन: एलिज़ाबैथ सनबे

चित्र: सुआना वैरेल्स्ट

मराठी भाषांतर : पल्लवी सतीश पाटील

# रजिया चा आशेचा किरण

## एका अफगाणी मुलीचे शाळेत जाण्याचे स्वप्न








लेखन: एलिज़ाबैथ सनबे

चित्र: सुआना वैरेल्स्ट

मराठी भाषांतर : पल्लवी सतीश पाटील

एके दिवशी गावातील ओसाड जमिनीवर बरीच माणसे जमली. तिथे नेमकं काय चाललंय या उत्सुकतेमुळे मी आणि माझ्या चुलत बहिणींनी त्या दिशेने पटकन धाव घेतली .



जवळ जाऊन पाहतो तर त्या ओसाड जमिनीवर आता रंगीबेरंगी पताके लावून सजावट केली होती. काही लोक विटा आणि दगड रचून एका इमारतीचा पाय बांधत असल्या सारखे वाटले. तिथे काही स्त्रिया पण होत्या. त्या लहान मुलांमध्ये चॉकलेट वाटत होत्या.

मी आणि माझ्या बहिणीने जमतील तेवढी चॉकलेटं गोळा केली. तोंडात आणि खिश्यात भरभरून चॉकलेटं कोंबली कि आम्ही पुन्हा पुन्हा मागायचो.





मी आणि माझी बहीण जारा चॉकलेट चा मनसोक्त आस्वाद घेत असताना आमचे आजोबा सांगू लागले , " एके काळी याच ओसाड जमिनीवर माझी शाळा होती. पण सतरा वर्षांपूर्वी एक युद्ध झाले आणि सर्व काही उध्वस्त झाले. "

"पण आज इथे काय चालू आहे आजोबा ? " मी कुतूहलाने विचारले.

"अगं रजिया बाळ, हे लोक खास मुलींसाठी एक नवी शाळा उभी करत आहेत." आजोबांनी हसत सांगितले.

"मला पण शिकायचे आहे" मी लगेच आनंदाने उडया मारत बोलले . कारण माझ्या भावांप्रमाणे मलाहि एक दिवस शाळेत प्रवेश मिळावा हे स्वप्न मी प्रत्येक रात्री उराशी बाळगून च मी झोपी जायचे"

" आजोबा प्लिज तुम्ही एकदा बाबा आणि अजीज दादा शी बोला ना याबद्दल. मला शाळेत जायची खरंच खूप खूप इच्छा आहे "



त्या संध्याकाळी जेव्हा माझे भाऊ घरी अभ्यास करत होते तेव्हा मी हळूच त्यांच्या शेजारी जाऊन बसले.

"जमील, मला एक कागद दे ना रे" मी विनंती केली .

"तुला कशाला कागद हवाय गं ? तुला तर लिहिता पण नाही येत " करीम थट्टेच्या सुरात बोलला.

मी लिहू शकत होते. मी सगळी बाराखडी तोंडपाठ केली होती आणि मला माझे नाव पण लिहिता येत होतं. पण माझ्या भावांना हे सांगण्याचे धाडस च होत न्हवते. जर मी त्यांना सांगितले तर ते अभ्यास करत असतील तेव्हा मला सोबत नाही बसू देणार या भीतीने मी गप्प राहायचे.





आजोबा एकटे असताना मी हळूच त्यांच्या कानात विचारायचे , " तुम्ही बाबा आणि अजीज दादा शी बोलला मला शाळेत पाठवण्याबद्दल ?"

"हो गं माझी छकुली, मी बोलेन. नक्की बोलेन" , ते लाडाने मला जवळ घेत म्हणायचे.

मी आई ची पण मदत घायचे ठरवले. " आई , त्या ओसाड जमिनीवर मुलींसहअली शाळा बांधतायत. तुला माहितेय ?"

"हो, मी पण ऐकलं याबद्दल" आई ने तंदुर चुलीवर नान शेकत शेकत उत्तर दिलं.

"आई, मला पण शाळेत जायचंय. तू प्लिज बाबा आणि अजीज दादा शी बोल ना गं . "

"ठीक आहे, पहाते बोलून " आई म्हणाली.

कित्येक महिने उलटून गेले. पण आई आणि आजोबांकडून मला काहीच कळालं नाही.

मार्च महिन्याच्या सुरुवाती पर्यंत शाळेची नवी ईमारत जवळपास पूर्ण झाली होती. भर उन्हात शाळेचा पांढरा रंग आणि लाल दरवाजा पाहिला कि असं वाटायचं जणू काही तंदूर चुलीतली ज्वलंत आगच !



दररोज दुपारी मी जेव्हा विहिरीवर पाणी भरायला जायचे , तेव्हा मला शाळेत प्रवेश घेऊन परतणाऱ्या मुली दिसायच्या. त्यांच्या हातात नव्या कोऱ्या वह्या आणि पुस्तकांचा गठ्ठा असायचा. त्यांना पाहून मला मनोमन वाटायचे कि आपण त्यांच्या जागी असतो तर ?

एके रात्री मी अंथरुणात पडून होते. तेव्हा आजोबांनी माझ्या बाबा, काका आणि भावंडाना एकत्र बोलावून घेतले. माझे पूर्ण लक्ष आता त्यांच्या गप्पांवर होते.

आजोबा शांत पण ठाम आवाजात बोलले , " रजिया ला शाळेत जायचे आहे. आणि माझी तिला संपूर्ण सहमती आहे. "



" युद्ध झाले आणि आपल्या देशाची पार वाट लागली. नाहीतर आधी अफगाणिस्तान मधल्या स्त्रिया सुद्धा लिहू-वाचू शकायचा. त्या काळी महिला डॉक्टर, सरकारी कर्मचारी आणि पत्रकार सुद्धा व्हायच्या. आता आपल्या मुलींना पुन्हा शिक्षणाची संधी देण्याची वेळ आली आहे. मुली शिकल्या तर च आपल्या घराची आणि देशाची प्रगती होईल."

माझा कानांवर अजिबात विश्वास च बसत न्हवता. खरंच मला शाळेत जाऊ देतील का ?



" पोरींनी घरात राहून आई ची मदत करायला हवी " इकबाल चाचू म्हणाले.

त्यांना साथ देत अली चाचू नी पण " शेती आणि फळबागेत रजिया ने हातभार लावावा " असे सांगितले.

" पण ही सगळी कामे तर रजिया शाळेतून आल्यावर किंवा जाण्या पूर्वी सुद्धा करू शकतेच की ! " आजोबा म्हणाले.

" आता तर तुम्ही हे पण म्हणाल की पोरींनी बाजारात जाऊन स्वतः खरेदी वगैरे करायला पण काही च हरकत नाही ", माझ्या बाबांनी रागाने प्रत्युत्तर दिले.

" किंवा हे हि कि बायकांनी बुरखा बाजूला करून सर्वांच्या समोर चेहरा दाखवत हिंडावे " भाऊ अहमद बोलला.

" रजिया शाळेत नाही जाणार . बस्स . " अजीज दादा ने चर्चेला पूर्ण विराम देत ठाम पणे जाहीर केले.

त्याचे ते शब्द माझ्या जिव्हारी लागले.



दुसऱ्या दिवशी सकाळी सगळी कामे पटापट आटोपून मी शाळेत गेले आणि इमारतीच्या चकचकीत लाल दरवाजावर हात थापत मी हाक मारली , " कुणी आहे का?" आतून एका महिलेने दरवाजा उघडला. आणि चेहऱ्यावर मंद हास्य ठेवून त्या म्हणाल्या , " माझे नाव रजिया जान . आत ये ना गं ."

आत पांढऱ्या शुभ्र रंगाने लेपलेली वाट होती. स्वच्छ खोल्या आणि त्यात नव्या कोऱ्या सतरंज्या , वह्या-पुस्तकं , पेन्सिल आणि चकचकीत फळा. "

" नमस्ते. माझे पण नाव रजिया आहे. मला तुमच्या शाळेत शिकायचे आहे . पण माझ्या वडिलांना आणि भावांना ते अजिबात मान्य नाहीये. तुम्ही मदत करू शकाल माझी ?"

माझ्या पाठीवरून हात फिरवत रजिया जान नी माझ्या घरी भेट देईन आणि सर्वांशी याबद्दल नक्की चर्चा करेन असे आश्वासन दिले.



घरी परतताच मी आजोबांकडे धाव घेतली.

" आजोबा, आजोबा, ऐका ना ... मुलींच्या नव्या शाळेच्या बाई तुम्हाला भेटायला आल्या आहेत. तुम्ही या ना त्यांच्याशी बोलायला "

आजोबा आणि बाईंनी थोडा वेळ एकमेकांशी चर्चा केली . आणि मग आजोबा माझ्या आई- बाबांना बोलवायला गेले.



बाईंनी माझ्या आईला आणि बाबांना समजावले,

“ शाळेत छोट्या मुलींना दारी , पाश्तो ,

( अफगाणिस्तान मधल्या अधिकृत भाषा )

इंग्लिश, गणित, आरोग्य या सारखे महत्वाचे विषय आणि स्वतःची काळजी घेणे शिकवले जाईल . मोठे झाल्यावर त्यांना कुराण वाचणे हि शिकवले जाईल. आणि सोबत इतिहास, भूगोल आणि विज्ञान पण ! सगळी पुस्तके शाळेकडून च मिळतील. शाळेचा गणवेश आणि एक वेळचे जेवण सुद्धा मुलींना देण्याची सोय शाळा च करेल. सर्व काही अगदी पूर्णपणे मोफत. "

एवढ्यात माझा भाऊ अजीज आला. रजिया जान बाईंनी त्याला आपली ओळख सांगितली. त्यांना माहिती होतं कि माझ्या भावाला समजावून सांगणं आणि त्याची मंजुरी घेणं गरजेचं आहे.

" माझी तुम्हांला विनंती आहे, जर रजिया च्या शाळेत जाण्यास तुमची नापसंती असेल, तरी किमान विरोध नका करू. विचार करून पहा , जर पुरुष वर्ग अफगाणिस्तान चा कणा आहे, तर महिला देशाची दृष्टी आहे. शिक्षणाविना आपण सर्व अंध च राहू ."

अजीज दादा ने बाईंशी हात मिळवला आणि तो शांत पणे खोलीतून बाहेर निघून गेला.

मी हि त्याच्या पाठोपाठ गेले.



" दादा, तुम्हाला आज बरे वाटत नाहीये का ? काय झाले ?" मी विचारले.

"हो गं . मला ताप आलाय. औषधं तर आहेत माझ्याकडे. पण करीम किंवा जमील असते तर औषध किती घायचंय हे वाचून ते मला सांगू शकले असते. "

मी अजीज दादा ला पाण्याचा ग्लास दिला. जेव्हा दादा विश्रांती साठी खाटेवर पडला तेव्हा मी औषधाच्या बाटली वर लिहिलेल्या सूचना हळूहळू वाचू लागले.





" तुला कसंकाय वाचायला येतं ? " अजीज दादा ने आश्चर्याने विचारले.

" मी रोज जमील आणि करीम त्यांचा अभ्यास करत असतात तेव्हा लक्ष देते . " औषधाच्या गोळ्या मोजून दादा च्या हातात ठेवत मी बोलले.



" दादा , प्लिज मला शाळेत जाण्याची परवानगी द्या ना . शिकल्यावर मी घरात आणखी मदत करू शकेन "

अजीज दादाने औषध घेत माझ्याकडे हसून पाहिले. आणि काही न बोलता ते अंथरुणात झोपी गेले.







एके दिवशी जिन्यावर बसून मी बटाटे सोलत होते तेव्हा अजीज दादा आले.

" रजिया , " त्यांनी हाक दिली, " मला आज च कळलं कि आमच्या खाणी मधल्या खडकांनी च शाळेची भिंत बांधत आहेत." बोलता बोलता ते थांबले. " मला विश्वास आहे कि तू त्या इमारती मध्ये सुरक्षित राहशील माझी लाडकी परी. तू रजिया बाईंच्या शाळेत जाऊ शकतेस. "



हे ऐकून मी आनंदाने उद्या मारत दादा ला घट्ट मिठी मारली.

" पण घरातील काम तुला शाळेत जाण्या आधी किंवा आल्यावर करावे लागेल बरं ", दादा ने प्रेमाने सांगितले.

" हो, नक्की च ! मी तुम्हाला नाराज होण्याची एक हि संधी देणार नाही दादा. खूप खूप धन्यवाद्य . थँक यू ." मी आनंदाने ओरडले.



शाळेत पहिल्या दिवशी बाईंनी आम्हाला स्वतःचे नाव सांगून, भविष्यात मला काय व्हायचे आहे या बद्दल हि बोलायला सांगितले.

माझी मैत्रीण सारा सगळ्यात आधी बोलली , " बाई, माझं नाव सारा आहे. मला मोठ्ठ होऊन इंजीनियर व्हायचं आहे "

राहिला पण आनंदाने बोट उंच करून वाट पाहत होती, म्हणून बाईंनी पुढची संधी तिला दिली.

" माझं नाव राहिला आहे. मला डॉक्टर वहायचे आहे. आपल्या गावात मला माझा दवाखाना उघडायचा आहे आणि लहान मुलांना मोफत उपचार द्यायचा आहे "





मी सगळ्यात शेवटी बोलले ,

" बाई, मी पहिल्या पासून च एक शिक्षिका होण्याचे स्वप्न पाहात आलेय. मी माझ्या आई आणि अजीज दादाला वचन दिलंय कि, सगळ्यात आधी मी त्या दोघांना शिकवून सराव करेन. "



## शिक्षण हे सर्वांसाठी

तुम्हाला बऱ्याचदा वाटत असेल कि शाळा चुकवावी किंवा शाळा बंद च व्हावी. पण विचार करा, जर तुम्हाला कधी शाळेत जाऊ च नाही दिले तर ? जर तुम्हाला कधी लिहिण्या वाचण्या ची संधी च दिली नाही तर ?

जगात शालेय वयातील तब्बल ६.९ कोटी मुलं कधी शाळेत जाऊ च शकत नाहीत . कॅनडा च्या दुप्पट आणि UK [ इंग्लंड ] देशाच्या एकूण लोक संख्येच्या किती तरी पटीने मोठी हि संख्या आहे. या मुलांमधील जवळ जवळ निम्मे, म्हणजे ३ कोटी मुलं हि सहारा- आफ्रिका मधली आणि, साधारणतः एक चतुर्थांश म्हणजे १.८ कोटी मुलं हि दक्षिण आशिया मधली आहेत. या मुलामुलींच्या शिक्षणापासून वंचित राहण्या मागे बरीच कारणे आहेत - गरिबी, राजकीय अस्थिरता, युद्ध , नैसर्गिक प्रतिकूलता इत्यादी. रजिया सारख्या बऱ्याच मुली आणि मुलांना शाळेत जाण्या पासून अडवले हि जाते कारण काही सांस्कृतिक किंवा सामाजिक घटकांमध्ये ते व्यर्ज मानले जाते. परिणामी त्यांना अशीच कामे मिळतात जिथे वेतन आणि सन्मान कमी मिळतो.

रजिया ची गोष्ट अफगाणिस्तान ची राजधानी काबुल, येथील उत्तरेस असलेल्या देहसब्ज़ गावातल्या मुलींच्या प्रत्यक्ष अनुभवातून प्रेरणा घेऊन लिहिली गेली.

विकसनशील देशांतील केवळ एक चतुर्थांश मुली च शाळेत जाऊ शकतात. अफगाणिस्तान मधील महिला साक्षरता केवळ १३ टक्के आहे. म्हणजे, तिथे १०० मागे फक्त १३ स्त्रिया लिहू-वाचु शकतात.

जर तुमच्या घरात आई ला लिहिता वाचता येत नसलं तर ? ती तुम्हाला देशातील घडामोडी, सरकारी कर, देशाचा नकाशा सांगू च शकणार नाही. इतकं च काय तर औषधाचे लेबल आणि डॉक्टरांची चिट्ठी पण ती वाचू शकणार नाही. ती गाडी नाही चालवू शकणार कारण त्याची परीक्षा ती देऊ नाही शकणार.

ज्यांना लिहिता वाचता येत नाही,त्यांना तर चांगला रोजगार पण मिळत नाही. त्यामुळे आर्थिक स्थिती खालावते .

स्त्री साक्षरतेमुळे योग्य रोजगार, घर आणि स्वास्थ्य उपलब्ध होते. ज्याचा फायदा त्यांनाच नाही तर संपूर्ण घराला आणि समाजाला होतो. त्यामुळे मुलींच्या शिक्षणामध्ये सर्वांची प्रगती आहे.



## खरी रजिया जान

मूळ रजिया जान चा जन्म अफगाणिस्तान मध्ये झाला. तरुण असताना त्या USA अमेरिका मध्ये गेल्या. तिथे कपडे शिवून त्यांनी अत्यंत मेहनतीने आपल्या मुलाला मैसाच्युसैटस् शहरात लहानाचे मोठे केले.

११ सप्टेंबर २००१ ला झालेल्या अतिरेकी हल्ल्या नंतर त्यांना वाटलं कि आपल्या देशातील लोकांसाठी अफगाणिस्तानात जाऊन काहीतरी करावे. त्यामुळे २००७ मध्ये त्यांनी 'रज़ियास् रे ऑफ होप फाउन्डेशन' ची स्थापना केली. शिक्षणातून अफगाणिस्तान मधील मुली आणि स्त्रियांचे जीवन सुधारण्याचे त्यांचे स्वप्न आणि अशा होती.

२००८ मध्ये रजिया ने अमेरिकेतील आरामदायी जीवन सोडून काबुल ला परतण्याचा निर्णय घेतला. त्यांनी मुलींसाठी ज़ाबूली तालीम केन्द्र उभे करण्याचे नियोजन केले. हे केंद्र अशा अशा सात गावांमध्ये होते जिथे मुलींसाठी कधीच शाळा बांधली गेली न्हवती. आज या केंद्रात जवळ जवळ पाचशेहून अधिक मुली शिक्षण घेत आहेत. रजिया सांगतात कि, "या मुली शाळेत इतक्या खुश आहेत कि कोणत्याही सुट्टीविना बाराही महिने शाळा सुरु राहावी अशी त्यांची मागणी असते. कित्येक मुली आपली वह्या पुस्तके घेऊन घरी घेऊन जातात आणि आपल्या आईला हि शिकवतात . या धडाडीच्या मुली आणि त्यांची शिक्षण घेण्याची चिकाटी या पुस्तक मागची खरी प्रेरणा आहे.

CNN ने २०१२ मध्ये आपल्या Top Ten Heroes च्या यादीत रजिया ला नमूद केले. हा सन्मान अशा जनतेतील सामान्य व्यक्तींना दिला जातो ज्यांनी समाजाच्या हितासाठी असाधारण कार्य केले आहे.

रजिया ला विश्वास आहे कि शिक्षणामुळे च जगात सकारात्मक आणि शांतीपूर्ण पध्धतीने खरा बदल घडवता येईल. तुम्ही सहमत आहात रजिया शी ?







# रजिया चा आशेचा किरण

रजिया दर रोज आपले भाऊ जमील आणि करीम प्रमाणे शाळेत जाण्याचं स्वप्न पहायची . जेव्हा गावात मुलींसाठी शाळेची नवी इमारत उभी होत असल्याचं तिला कळालं , ती आनंदाने बहरली. आता शाळेत जाण्या साठी तिला फक्त आपल्या वडील आणि भावाच्या परवानगी ची गरज होती.

आपल्या इच्छेवर ठाम असलेल्या रजिया ने पुढाकार घेऊन, आजोबा, आई आणि शाळेतल्या शिक्षिकेची पण मदत मागितली. त्यांनी घरातील पुरुषांना हे पटवून देण्याचा प्रयत्न केला कि जर घरातील मुली शिकल्या तर फक्त त्या परिवाराचीच नाही, तर पूर्ण समाज आणि देशाची हि प्रगती होईल.

